१) भगवान श्री गणेशांची अत्यंत प्रिय तिथी - चतुर्थी. गाणपत्य सांप्रदायी करीता, श्रीगणेशोपासकांकरिता सर्वोत्तम व्रतराज म्हणजे चतुर्थी.

श्री चतुर्थी महात्म्य!
भगवान श्री गणराज प्रभूंची प्राणप्रिय तिथी आहे चतुर्थी. अगदी आबालवृद्ध सगळ्यांनाच हे ज्ञात आहे की मोरयाची आवडती तिथी आहे चतुर्थी. पण प्रश्न आहे की काय आहे नेमकी ही चतुर्थी ? केवळ पंचांगातील चवथा दिवस इतकाच अर्थ असेल का? जर तेवढाच अर्थ असेल तर ज्या सगळ्याच काळाला भगवंतानीच घडविले त्यातील एखादाच दिवस त्यांना वेगळा प्रिय कसा असेल? मग काय आहे चतुर्थी?

चतुर्थी विज्ञान हा अध्यात्म शास्त्राचा विचार आहे आणि अध्यात्माच्या दृष्टीने ती चवथी अवस्था आहे कोणती चवथी अवस्था ? तर तीनच्या पार ती चवथी. तीन हा अंक उच्चारला की आध्यात्मिक शास्त्रातील तीनचे विविध संदर्भ सहजच नजरे समोर तरळतात. तीन म्हटले की त्रिगुण, तीन म्हटले की त्रिकाळ, तीन म्हटले की त्रीदेह .

सत्व, रज, तम, या तीन गुणांच्या पलीकडची ती चतुर्थी, भूत, वर्तमान, भविष्य या तीनच्या अतीत ती चतुर्थी. स्थुल, सूक्ष्म, कारण देहाच्या पार ती चतुर्थी.

मात्र या तीनही कथनात एक अडचण आहे. सत्व, रज, तम हे तीनच गुण आहेत. यांच्या पार म्हटले की फारतर निर्गुण म्हणता येते. कालही तीनच आहेत त्यांच्या पलीकडे म्हणतांना फक्त कालातीत असेच म्हणावे लागते. देहत्रयातीत मध्येही अशीच अडचण आहे. कारण चवथा गुण, चवथा काळ, चवथा देह अस्तित्वाचा नाही. मग चतुर्थी ही अभावात्मक आहे का? तर मुळीच नाही.
याच कारणाने श्रीगणेश अथर्वशीर्षात एक चवथा पाठ आहे. हा चवथा पाठच चतुर्थीचे रहस्य आहे. कोणता आहे तो पाठ?

आरंभीचे तीन कथने आहेत-
त्वं गुणत्रयातीत:
त्वं देहत्रयातीत:
त्वं कालत्रयातीत:!

पण या तीन मध्येही चवथी रचना नाही आहे ती गुणत्रया शिवाय अशी निषेध परच. पण चवथा पाठ आहे त्वं अवस्थात्रयातीत:! हे गणराजा तू तीन अवस्थांच्या पार आहेस आणि महत्वाचे म्हणजे ही चवथी अवस्था अभावात्मक नाही. निषेधपर नाही. तर ती अस्तित्वपर आहे.

शास्त्र चार अवस्थांचा विचार मांडते जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती अशा तीन अवस्था आहेत. या तीन अवस्थांच्या पार आहे आपला मोरया. ही चवथी अवस्था आहे "तुरीयावस्था". ही चवथी अवस्था आहे मोरयाची प्रिय अवस्था. तिला म्हणतात चतुर्थी.

आधीच्या तीनही अवस्थांमध्ये पहा कशी अडचण आहे. जागृती आणि स्वप्नात आपणास ज्ञान आहे पण ते ज्ञान सत्य नाही, भासमान आहे सुषुप्तीत (गाढ निद्रावस्था) लोपले आहेत. पण तेथे भानही लोपले आहे. ज्ञान आहे तर भान नाही आणि भान आहे तर ज्ञान नाही अशी ही अडचण आहे. मात्र चवथी अवस्था या अडचणीवरील मात आहे.

या अवस्थेत जागृतीतील भानही आहे आणि सुषुप्तीतील ज्ञानही आहे. जागृतीतील भानासह सुषुप्तीचे ज्ञान वा सूषुप्तीच्या ज्ञानावर अधिष्ठित जागृती मधील भान म्हणजे "तुरीयावस्था".
येथे जागृतीतील सुस्पष्ट दर्शन आहे आणि त्याच वेळी या दर्शनातील नश्वरतेचे ज्ञानही प्रगट आहे. सामान्य माणूस जागृत, स्वप्नस्थ गोष्टीत रमतो. यातील प्राप्तीलाच सत्य मानत राहतो. मात्र स्वप्नातील प्राप्ती प्रमाणेच जागृतीतील प्राप्तीही नश्वर आहे. या नश्वरनिष्ठेतेचा त्याग करीत ईश्वरनिष्ठ होण्याच्या प्रयासाचे नाव आहे चतुर्थी.

चतुर्थी करणे याचा अर्थच आहे ही अवस्था मिळवणे. किमान त्यासाठी प्रयास करीत राहणे.
एका मोरया शिवाय अन्य सर्व नश्वर आहे, ह्या ठाम जाणीवेच्या प्रगटीकरणाचा प्रयास आहे चतुर्थी, म्हणूनच श्रीगणेशांची ही प्राणप्रिय तिथी अन्य कोणत्याही शुभकार्यास त्याज्य मानली आहे. लोक प्रश्न करतात की मोरयाची एवढी प्रिय तिथी मग लग्न, मौज, गृहप्रवेश, नवीनखरेदी, बांधकाम इ. सगळ्यांसाठी ही तिथी 'वर्ज्य कां? त्याज्य कां? तर प्रश्न तिथीचा नाही या पदार्थाच्या प्राप्तीच्या त्याज्यतेचा आहे, मोरया समोर हे सर्व त्याज्य आहे हे त्यातून अधोरेखित करायचे आहे.
त्रिगुण, त्रिकाल, त्रिदेह हे त्यागल्यावरच ती तुरीयावस्था साधणार आहे. किमान या त्यागाचा संकल्प, तशी मनीषा जागवणे म्हणजे "चतुर्थी करणे" त्याचा आपण करतो तसा केवळ "खाद्यपदार्थ बदल" इतका सामान्य अर्थ नाही. खाद्य बंदीचा भाग केवळ इतकाच असतो की ज्या अन्नामुळे हा देह चालतो असे आपल्याला बाह्यत: वाटते त्या भ्रांतीला सोडून ज्याच्या सत्तेवर तो देह चालतो त्या गणराज प्रभुंचेच अखंड चिंतन करणे. अन्नाद्वारे हा चालतो या भ्रांतीला सोडणे म्हणजे भोजन त्यागणे हे होणार नसेल आणि आठवण जेवणाचीच जागृत असेल तर उपवास म्हणायचे तरी कसे?

अन्न सुध्दा ब्रम्हच आहे. पण या अन्न ब्रम्हाच्या पार जात ब्रह्मणस्पती चिंतनाचा काळ म्हणजे चतुर्थी.

अन्नानेही तृप्ती लाभतेच, नाही असे नाही पण ती चिरंतन नसते. चार पाच तासात पुन्हा भूक पेटतेच. जगातील सगळ्याच बाह्यपदार्थांगत तृप्तीचे असेच असते. पद, पैसा, प्रतिष्ठा, पुरस्कार या सगळ्याबाबी आनंद देतातच. पण तो शाश्वत नाही. चिरंतन नाही. कारण त्या बाबीच चिरंतन नाहीत मग त्यापासून मिळणारा आनंद चिरंतन कसा असेल? याचे चिंतन आहे चतुर्थी.

या नश्वरतेच्या त्यागाने ईश्वरशरणतेला मजबूत करण्याचा प्रयास आहे चतुर्थी.

चतुर्थीचा हा खरा आध्यात्मिक अर्थ आहे. बाकी कथा या मूलार्थाला प्रगट करण्याकरीता प्रतिकात्मक रुपात केलेले वर्णन असते. ते केवळ वरपांगी पाहून चालत नाही. नाही तर चार हात. चार पाय, चार मस्तक अशी कुठे कोणी स्त्री असते तरी कां? पण तरी हे वर्णन पुराणकर करतात. काय प्रतीकात्मक अर्थ असेल त्या वर्णनाचा? आगामी लेखात या चतुर्थीच्या स्वरूपाचा विचार करू.
जय गणेश!

श्रीगणराज प्रभूंच्या परमप्रिय अशा चतुर्थी तिथीचे तात्विक स्वरूप आपण प्रथम लेखात पाहिले. ते निर्गुण निराकार तत्वचिंतन वास्तव कथनीय असते. तेच सगळ्या विवेचनाचा आधार असते. मात्र सर्वसामान्य साधकांना, भक्तांना अखंड निर्गुण अनुसंधान असंभव असते. याच कारणाने भारतीय संस्कृतीने सगुण साकार उपासनेला स्थान दिले आहे.
या सगुणोपासनेचा आधार रुपात मूर्ती ही संकल्पना पुढे आली. मूर्तीपूजा हा भारतीय संस्कृतीचा फार चिंतनीय पैलू आहे. चिंतन अमुर्ताचेच (निर्गुणाचे) करायचे आहे. मात्र अमुर्ताच्या चिंतनाचा मार्ग आहे मूर्ती, मूर्ती हे साधन आहे. माध्यम आहे. सोय आहे.
ओंकार रूप परब्रम्ह परमात्म स्वरूपाच्या निर्गुण निराकार गणराज प्रभूंचे नित्य चिंतन संभव नसल्याने त्याच स्वरुपात त्यांचे ध्यान करता येण्यासाठी "गज" मस्तकधारी मोरयाचे रूप प्रगट झाले.

गज शब्द पलटवला की जग होतो. जग सगुण, साकार, सावयव आहे. त्याच्या विपरीत अर्थात निर्गुण, निराकार, निरवयव ते "गज" आणि हेच ज्यांचे ओळखण्याचे साधनरूप मस्तक ते "श्रीगजानन"! मूर्तीच्या मागे हे कथनीय असते. यात केवळ हत्ती नामक प्राण्याच्या मस्तकाचा हिशोब नसतो ते प्रतिक आहे. "गज" चा उपरोक्त अर्थ चित्रात वा मूर्तीत दाखवता येत नसल्याने "गज" चा लौकिकार्थ स्वीकारत हत्तीचे डोके दाखविले जाते, तो नाईलाज असतो. त्यामुळे साधकाला काही अडचण येत नाही. तो पाहतो "गज" म्हणजे हत्तीचे मस्तक मात्र त्यावेळी चिंतन करतो "गज" म्हणजे निर्गुणत्वाचे. यालाच म्हणतात मूर्तीच्या आधारे अमुतीचे चिंतन.

भारतीय संस्कृतीत सगळ्याच देवतांच्या मूर्त रुपामागे असेच अमूर्त चिंतन अभिप्रेत असते. केवळ देवताच नाही तर त्यांच्या अन्य सर्व उपांगांचेही असेच प्रतीकात्मक मूर्तीविज्ञान आपल्या संस्कृतीत विकसित झाले आहे.

याच स्वरुपात गाणपत्य संप्रदायात देवी चतुर्थीच्याही मूर्तीचे मोठे मार्मिक वर्णन करण्यात आलेले आहे.
श्रीमुदगल पुराणाच्या चतुर्थ खंडात हे चतुर्थी विज्ञान सांगोपांग रीतीने वर्णिले आहे. त्या चतुर्थ खंडाच्या प्रथमाध्यायात चतुर्थीच्या सगुणप्रगटीकरणाचे कथन आले आहे.
भगवान श्री बेह्मदेव आपल्या अवतारकार्य रूप विश्वनिर्माण कार्यास आरंभ करते झाले. चराचर सृष्टीची निर्मिती झाली. जडसृष्टी नंतर ८४ लक्ष जीवयोनिंनी युक्त चैतन्यमयी सृष्टी निर्माण झाली. आता या सगळ्या सृष्टीच्या सुसूत्र संचालनार्थ एक यंत्रणा असावी. स्वयंपूर्ण नियंत्रणाची एक सुविधा असावी असा विचार श्री ब्रह्मदेवांच्या मनात आला. सकलकार्य सिद्धीदात्या श्रीगणराजांची आळवणी करीत त्यांनी अशा शक्तीच्या प्रगटीकरणाचा संकल्प केला आणि त्यांच्या समोर एक दिव्य स्त्री मूर्ती प्रगटली.

श्रीमुदगलपुराणकार वर्णन करतात --
ततस्तस्थ शरीरादवै नि:सृता प्रकृती: परा !
महामाया तिर्थीना सा जननी कामरूपिणी !
चतुष्पंदा तथा दक्ष चतुर्हस्ता सुशोभनाम !
चतुर्मुखयुता वीक्ष्य हर्षितोऽभूत प्रजापति: ! (४/१/२८-२९)

अशा गणेशचिंतनरत अवस्थेत त्यांच्या मनातून पराप्रकृती, महामाया, सकलतीर्थींची जननी देवी चतुर्थी प्रगट झाली.
ती देवी चार पाय, चार हात तथा चार मुखांनी युक्त होती. तिला पाहून श्रीब्रह्मदेव अतीव आनंदित झाले.

तिने निर्माता रुपात श्रीब्रह्मदेवांना पिता समजून वंदन केले. त्यांनी तिला श्रीगणेशोपासनेचा मार्ग दिला. तिने आराधना केली. परिणामरुपात श्रीगणराजप्रभू प्रसन्न झाले व त्यांनी स्वत:च्या प्रिय तिथीत्वासह अन्यतीथीच्या उत्पत्तीची क्षमता प्रदान केली.

या वरदानानुसार चतुर्थीच्या शरीरातून अन्य सर्व तिथी प्रगट झाल्या.

मुखकमलातून प्रतिपदा, नासिकेतून द्वितीया, वृक्षस्थलातून तृतीया, अंगुलीतून पंचमी, हृदयातून षष्ठी, डोळ्यांपासून सप्तमी, बाहुंपासून अष्टमी, उदरातून नवमी, कर्णदेशातून दशमी, कंठापासून एकादशी, पायापासून द्वादशी, स्तनांमधून त्रयोदशी तर अहंकारापासून चतुर्दशी निर्माण झाली. तिच्या मनातून पौर्णिमा व अमावस्या या तिथी निर्माण झाल्या.

अर्थात हे सगळ वर्णन प्रतीकात्मक असते. सगळ्या तिथी चतुर्थीच्या अवयवांमधून निर्माण झाल्या अर्थात त्या अंगभूत असून, अवयव रूप असून, भागमात्र असून परिपूर्ण अंगरूप, अवयवीरूप, पूर्णरूप तिथी आहे चतुर्थी असा त्याचा कथनार्थ असतो.

सोप्या शब्दात अन्य सर्व तिथी, त्या तिथीला केली जाणारी व्रते, उपासना या सगळ्या पेक्षा चतुर्थीव्रताचे महत्व सर्वोपरी हे सांगण्याची ही पौराणिक शैली आहे. सगळ्या अन्य व्रतांनी केवळ एकेका अंगाचाच लाभ होतो मात्र संपूर्ण लाभ हवा असेल तर आचरणीय व्रत आहे "चतुर्थी" हे सांगण्याची ही पौराणिक पद्धती आहे.

चतुर्थीचे स्वरूपही असेच चिंतनीय आहे. तिचे स्वरूपही असेच प्रतीकात्मक आहे. चार पाय, चार हात, चार मुखे अशी स्त्री नसतेच. मग काय आहे या अलौकिक रूपाचे रहस्य.
चार पाय याचा अर्थ चार गती गाणपत्य संप्रदायात श्रीगणराजांप्रती जाण्याच्या चार स्तरांचा विचार केलेला आहे. असत, सत, सम, आणि नेती अशा रुपात त्या चार गतींचा, अवस्थांचा विचार मांडण्यात आला आहे. (अर्थात हा फार विस्तृत विवेचनाचा विषय आहे. ज्यांना अधिक उत्सुकता असेल त्यांनी श्रीमुदगल पुराण कथारूप आणि विष्लेषण ग्रंथमालिकेतील प्रथम व द्वितीय खंड वाचावेत) या चार ही गतींचे, अवस्थांचे प्रतिक आहेत चार पाय.

अर्थात तुरीयावस्थारूप चतुर्थीप्रत पोहचायचे तर या चार गतींच्या वर उठावे लागते. त्यावर चतुर्थी दशा आहे हे सांगण्यासाठी या 'चार' ला 'पाय' म्हटले.

देवी चतुर्थीला चार हात असतात. हात हे कृतीशीलतेचे प्रतिक आहेत. कर्माचे प्रतिक आहे. मनुष्य चार प्रकारची कर्मे करतो. कायिक, वाचिक, मानसिक तथा बौद्धिक. या चारही कृतींनी गणराज उपासना घडावी हे सांगण्याचे प्रतिक आहे चतुर्थीचे चार हात.

चतुर्थीला चार मुखे आहेत. मुखाने आपण पाहणे, ऐकणे, चव घेणे, गंध घेणे तथा स्पर्श अशा पाचही अंगांनी आनंद घेत असतो. अत: शरीरात मुखास सगळ्यात महत्वाचे स्थान आहे.
या सगळ्या आंनदाचे मार्ग रुपात भारतीय संस्कृतीने चतुर्विध पुरुषार्थाचे वर्णन केले आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष, रूप पुरुषार्थाचे वर्णन भारतीय धर्मग्रंथांमध्ये आले आहे. पुरुषार्थ म्हणजे पुरुषाने प्राप्त करण्याच्या बाबी. या चार मार्गाने तो आंनदाचा अनुभव घेत असतो. या चार माध्यमांनी प्रसन्नता अनुभवतो. अत: ही चार मुखकमले आहेत.

अर्थात चार अवस्था, चार कर्मे तर चार आनंदानी युक्त साधकदशा ती चतुर्थी. सगुण जगतात या बाह्यांगांती आनंद घेण्यासाठी बाह्य रुपात चतुर्थी अशी असते. आणि अंतरंगी तिचे स्वरूप गुण, काल, देह, त्रयातीत तुरीयावस्था असते.

अशा स्वरुपात बारा महिन्यात चोवीस चतुर्थी येतात. तथा अधिक मासातील दोन अशा सव्वीस चतुर्थींच्या विविध बावन्न कथा श्रीमुदगल पुराणात वर्णिल्या आहेत. कथा आहेत त्या कथा ? पुढील भागात पाहू . तो पर्यंत
जय गणेश !

कथा चतुर्थीच्या एक चिंतन

कोणतेही व्रत म्हटले की त्या व्रतार्थ प्रेरणा देणे हे शास्त्रग्रंथांचे एक प्रधान कार्य असते. याच कारणाने श्रीमुदगल पुराणाचा चतुर्थ खंड चतुर्थी व्रत कथांसाठी जणू समर्पित आहे.
१२ महिन्यात येणाऱ्या २४ चतुर्थी आणि अधिक मासातील २ अशा २६ चातुर्थींच्या ५२ कथा श्रीमुदगल पुराणात वर्णित आहे.

गाणपत्य संप्रदायात दोन्ही चतुर्थींना समान महत्व दिले आहे. शुध्द पक्षात अर्थात अमावस्ये नंतर येणा-या चतुर्थीस विनायकी चतुर्थी असे म्हणतात. तर वद्य पक्षात अर्थात पोर्णिमे नंतर येणा-या चतुर्थीस संकष्टी चतुर्थी म्हणतात. विनायकी चतुर्थीचे व्रत अष्ट प्रहरात्मक अर्थात पूर्ण दिवसाचे असते. संपूर्ण दिवस उपवास करून पंचमीसच पारणे केले जाते. तर संकष्टी चतुर्थीचे व्रत हे सकामोपासकांसाठी पंचप्रहरात्मक वर्णिले आहे. अर्थात चंद्रोदयानंतर श्रीगणेशपूजन आरती इ. करून भोजन घेण्याचा प्रघात आहे. मात्र निर्गुणोपासकांसाठी हे व्रतही पूर्ण दिवस करण्याची संप्रदायिक रीती आहे.

दोन्ही चतुर्थींना मंगळवार आल्यास अधिक महत्व दिले जाते. विनायकी चतुर्थी मंगळवारी आल्यास त्यास अंगारक योग म्हणतात तर संकष्टी मंगळवारी आल्यास तिला अंगारकी चतुर्थी म्हणतात. विनायकीची प्रधानपूजा मध्यान्ह काळी तर संकष्टीची प्रधानपूजा चंद्रोदय समयी करतात.

गाणपत्य संप्रदायात आचमन ते विसर्जन केवळ श्रीगणेशपर मंत्रांचाच उपयोग करून पूजन करण्याची रीती आहे. (त्या करीता पहा संजना प्रकाशन मुंबई प्रकाशित पुस्तक श्रीगणेशोपासनेचा ओनामा)
या दोन्ही चतुर्थींना श्रीगणेशपूजनानंतर श्रीगणेश तथा देवी चतुर्थीला अर्घ्य द्यावेत. प्रथम चतुर्थीला अर्घ्य द्यावा. त्या करीता-

तिथींना मातृरुपे त्वं देवि सर्वार्थदायिनी!
ग्रहाणार्घ्यं मया दत्तं चतुर्थिते नमो नम:!

या मंत्राचा उच्चार करून तीन अर्घ्य द्यावेत. त्यानंतर-

गजानन नमस्तुभ्यं नाना सिद्धी प्रदायिने!
बुद्धीयते ग्रहांनार्घ्यं मया दत्तं शुभप्रदम!

या मंत्राने श्रीगणेशानां तीन अर्घ्य द्यावेत.
संकष्टी चतुर्थीला या दोघांच्यानंतर-

अत्रिगोत्र समुदभूतं गणेशपितीवर्धनम!
ग्रहाणार्घ्यं मया दत्तं रोहिण्यामृतधारक!

या मंत्राने श्रीचंद्राला सात अर्घ्य द्यावेत.

अशा रीतीने चतुर्थी व्रत करणे श्रीगणेशांना अतीव प्रिय आहे. अशा या व्रताचरनार्थ प्रेरित करण्यासाठी श्रीमुदगल पुराणाने अनेक कथा वर्णिल्या.
पुराणांच्या या कथा दोन प्रकारच्या असतात.

एका प्रकारास म्हणतात विधीकथा तर दुसरा प्रकार म्हणजे निषेध कथा.
विधीकथा म्हणजे यांनी यांनी हे व्रत केले. त्यांना हे हे लाभ झाले. अत: तुम्हालाही हे लाभ हवे असतील तर तुम्हीही हे व्रत करा अशी प्रेरणा देणा-या कथा.

तर दुसरा प्रकार म्हणजे निषेध कथा. अर्थात यांनी यांनी या व्रताचे पालन केले नाही ही म्हणून त्यांना ही दु:खे भोगावी लागली. जर तुम्हाला ही दु:खे नको असतील तर व्रत करा. अशी "भीतीपोटी जीती" सांगणा-या कथा म्हणजे निषेध कथा. दोन्हींचा उद्देश एकच असतो प्रीतीने असो की भीतीने असो माणसाला व्रताचारी बनविणे.

या व्रताचरणाकरीता व्रतमाहात्म्यास अनेकदा अतिशयोक्ती पूर्ण रीतीने वर्णिले जाते. उदा. "एका गावात एक महापापी दरोडेखोर होता किंवा एक वेश्या होती. तृतीयेस त्याने इतके मद्यपान केले की त्याची वा तिची सगळी चतुर्थी त्या बेशुद्धीतच गेली. पंचमीस सकाळी त्यास साप चावला व तो मेला आणि

थेट स्वानंद लोकास गेला" अशा कल्पनातीत कथा श्रीमुदगलात सापडतील.

आता प्रश्न आहे की खरेच मुक्ती इतकी सोपी आहे कां? तर मुळीच नाही. मग अशी कथा कां सांगितली तर त्याचा कथनीय उद्देश समजून घ्यायला हवा. जर इतका पापी व्यक्तीही अजाणता घडलेल्या व्रताने उद्धरून जातो तर माझ्या समान सदवर्तनी व्यक्तीस जाणीवपूर्वक व्रत केल्यावर इप्सित फल प्राप्ती निश्चित होणारच हा विश्वास निर्माण करणे इतकेच या कथेचे सार असते. अन्य सर्व कथाही अशाच अंगांनी "समजून" घेतल्या तर मग त्या विचित्र भाकडकथा न वाटता प्रेरणादायी उपाय वाटतील की जी त्या कथांचा खरा उद्देश आहे.

जलोदरापासून महारोगापर्यंतचे सगळे रोग, दुष्काळापासून अतिवृष्टीपर्यंतची संकटे आणि निपुत्रीकतेपासून राज्यहानी पर्यंतची सगळी दु:खे दूर करण्याचा एकमात्र उपाय म्हणजे जणू चतुर्थी. अशा स्वरुपात या कथा पहावयास मिळतात. कोणत्याही उपरोक्त दु:खग्रस्ताला त्या त्या अध्यायात भेटलेले श्रीगुरू चतुर्थीच सांगतात.

अशा कथनाचे अनेक हेतू आहेत ते आम्ही शांतपणे समजून घेतले पाहिजे एक तर सगळ्याच ऋषीमुनीनी एकमुखाने चतुर्थी महात्म्य सांगणे हे त्याच्या सर्वमान्यतेचा गौरव करणे आहे. इतकी वेगवेगळी दु:खे वर्णिली आहेत की त्या मानाने आपल्या जीवनातील दु:खे काहीच नाहीत. इतकी दु:खे पहिली की एक तर आपणास तसेच हलके वाटते की आपण "बरे" आहोत. आणि मग विश्वास निर्माण होतो की ही दु:खेही गेली तर माझे तर जाणारच या विश्वासाने व्रताचरण केले की मिळणारा मानसिक आधार व्रताचे खरे उपयोगित्व आहे.

अर्थात सगळ्यात महत्वाचे प्रयोजन एकच श्रीगणेशकृपा. ती झाली की मग काय असंभव?

"किं दुर्लभं विघ्नहरे प्रसन्ने"

अर्थात श्रीविघ्नराज प्रसन्न झाल्यावर दुर्लभ ते काय असणार? त्या करीता त्यांनाच प्रार्थना म्हणजे चतुर्थी!

!! जय गणेश !!

माघ शु. चतुर्थी! श्रीविनायक जन्मोत्सव!

भगवान श्री गणेशांच्या हजारो अवतारांचे वर्णन श्रीमुदगल पुराणकारांनी केलेले आहे. या प्रत्येक अवताराचे प्रयोजन मातापिता, राक्षसवध, भक्तसंरक्षण इ. लीला वेगवेगळ्या आहेत.

आपणास मात्र सामान्यत: गणेशजन्माची एकच कथा ज्ञात असते. तीच भाद्रपदी चतुर्थीला आणि तीच माघी चतुर्थीलाही सांगून आपण मोकळे होतो. वास्तविक ती कथा आहे कार्तिक शुध्द चतुर्थीची. त्या दिवशी श्रीगणेशांचा "उमांगमलज" नामक अवतार झाला. आपणास ज्ञात असलेली सर्वश्रुत कथा त्या चतुर्थीची आहे.

आज 23 जानेवारी २०१५ माघ शु. चतुर्थी. आजचा गणेशजन्म आहे श्रीविनायक जन्मोत्सव. या चतुर्थीचे वैभव हे आहे की ही या पृथ्वीची चतुर्थी आहे. महामुनी कश्यप तथा देवी अदितीच्या आश्रमात झालेला हा पृथ्वीवरील अवतार आहे.
श्रीमन मुदगल पुराणाच्या द्वितीय खंडात हे विनायक चरित्र खूप विस्तारपूर्वक वर्णिले आहे. संक्षिप्तत: त्याचा आढावा घेऊ.

गौड प्रांतात रुद्रकेतू तथा शारदा नामक दाम्पत्याला जुळी अपत्ये झाली. त्यांची देवांतक तथा नरांतक अशी नावे रूढ झाली. देवर्षी नारदांनी या दोघांना शिवपंचाक्षरी महामंत्राचा उपदेश करून तपाचरणास लावले. वरदान रुपात "श्रीब्रह्मदेव निर्मित कोणत्याही पदार्थाने मृत्यू नसावा" असा अदभुत वर मिळाला आणि मग जणू आपण अमर झालो या भावनेने त्यांची राक्षसीवृत्ती जगाला त्रस्त करू लागली.
त्रीभूवनावर सत्ता स्थापन झाली. देवता स्वलोकातून निर्वासित झाल्या. अरण्यवासी ठरल्या. मग यांनी देवता आहार रूप यज्ञाचा विनाश सुरु केला. देवतांना उपवास घडू लागले आणि त्यांच्या या दु:खाने सर्वाधिक व्यथित झाली ती देवमाता आदिती.

श्रीकश्यपांसमोर तिने आपली व्यथा मांडली आणि उत्तररुपात तिला श्रीगणेशोपासना रहस्य प्राप्त झाले. त्या आधारे तिने कठोर तपाचरण केले आणि फलरुपात श्रीगणेशदर्शन तथा पुत्ररुपात आश्रमात अवतरण्याचे त्यांचे श्रीवचन लाभले.

इकडे देवांतक नरांतक अत्याचाराने त्रस्त झालेल्या देवतांनाही अंतिम उपाय रुपात श्रीगणेशाराधन सुरु केले आणि या सगळ्यांच्या आर्ततापूर्ण हाकेला प्रतिसाद रुपात माघ शु. चतुर्थीला कश्यपगृही भगवान श्रीविनायक रुपात अवतीर्ण झाले.

या अवतारात अनेकानेक बाललीला पहावयास मिळाल्या. श्रीमुदगलपुराणापेक्षा या बाललीलांचे कौतुक श्रीगणेशपुराणाच्या क्रीडाखंडात अधिक व्यापक रीतीने शब्दबद्ध करण्यात आले आहे.
यातील अनेक लीलांचे तात्पर्यार्थ मोठे अदभुत आहेत. उदा. श्री विनायकाच्या उपनयन प्रसंगी अनेक देवतांनी त्यांना भेट रुपात शस्त्रास्त्रे दिली. वरपांगी पाहता उपनयन तर शास्त्राभ्यासाचा आरंभ. मग शस्त्रे का दिली? तर जोवर शास्त्र आणि शस्त्र यांचा समन्वय होत नाही तोवर देवांतक, नरांतक या वृत्तींचा विनाश संभव नाही.

पुराणकारांनी वर्णिलेले राक्षस या केवळ व्यक्ती नसतात तर त्या प्रवृत्ती असतात. देव कार्यास विरोध करतात ते देवांतक. तर मानवीय मूल्यांना उध्वस्त करतात ते नरांतक. यांच्या निर्दालनाकरीता शस्त्र अनिवार्य आहे. हा या कथेचा भाव समजून घेणे आणि आचरणात आणणे आवश्यक आहे.
गंधर्वकथा ही अशीच रोचक कथा. गंधर्वांचे राजे हाहा आणि हुहु हे कश्यपाश्रमात आले. बालविनायक तेथे खेळत होते. या गंधर्वांनी पंचायतन पूजा आरंभिली. श्रीगणेश, श्रीविष्णू, श्रीशंकर, श्रीदेवी तथा श्रीसूर्य या पाचही देवतांचे नियमित पूजन करण्यास पंचायतन पूजन असे म्हणतात. याचे मूळ कारण सगळ्या मार्गांचा समन्वय असते. मात्र पाचांची पूजा करतांना त्यांना वेगवेगळे मानण्यात आणि आम्ही पाचांचीही पूजा करतो याचाच अभिमान आणि पुढे जाऊन अहंकार वाटणा-या गंधर्वांना श्री विनायकाने धडा शिकवला.

श्रीविनायकांनी त्या पाचही मूर्ती गिळून टाकल्या. मग आकांडतांडव करणा-या गंधर्वांना स्वत:च

पाचही रुपात दर्शन दिले. सगळे काही "मोरयाच" आहे हे समजावून सांगणारी ही मोरया कृती आहे. श्री विनायकांच्या लीला स्थानात कश्यपाश्रमाशिवाय काशीक्षेत्रालाही मोठे वैभवशाली स्थान आहे.

काशीराज्याच्या मुलाच्या विवाहाच्या निमित्ताने श्रीविनायक काशी नगरीत आले. तेथे त्यांनी सगळ्याच गावक-यांना लळा लावला. सगळ्यांनाच वाटू लागले की श्रीविनायक आपल्या घरी यावेत. हा आग्रह खूपच वाढला आणि मग एकेदिवशी श्रीविनायकांनी घोषित केले उद्या आम्ही सगळ्यांच्याच घरी येऊ. ही वार्ता सगळ्या गावात पोहोचली. गावाबाहेर एका झोपडीत राहणा-या महर्षी शुक्ल तथा देवी विद्रुमा नामक गरीब दाम्पत्याला ही वार्ता कळली. पण आनंदव्यक्त करावा ही व्यथा हेच कळेना. कारण प्रभू घरी येणार हा आनंद पण स्वागताला घरात फुटकी कवडीही नाही याचे दु:ख.
शेवटी आहे त्यासह स्वागताची तयारी सुरु झाली. राखेने रांगोळी, दर्भाने ध्वजा, फुलाने आसन तयार करण्यात आले. पण खायला काय देणार? शेवटी भिक्षा मागितली. मिळेल त्या सगळ्याचे पीठ करून लापसी करण्यात आली.

दुस-या दिवशी राजवैभवाने स्वागत करणा-या सगळ्यांना सोडून भगवान श्रीशुक्लांच्या झोपडीतच गेले. भगवान वैभवाचा नव्हे तर भावाचा भुकेला असतो हे सांगणारी ही कथा.

विनायक अवताराची वैभवशाली कथा आहे चतुर्थी वैभव कथनकारी श्री भृशुंडीकथा.
एके दिवशी सकाळीच काशीराजा श्रीविनायकांच्या महाली आले आणि त्यांनी जे दृश्य पाहिले त्यावर त्यांचा विश्वासच बसेना. कारण श्री विनायकांची अशा दिव्यतम उपचारांनी श्रीविनायकांची पूजा संपन्न झाली होती की जे उपचार काशिराजाला राजवाडयात सुद्धा संभव नव्हते. ही पूजा कोणी? कधी? कशी? केली असे अनेक प्रश्न राजाच्या मनात आले. राजवाडयात येऊन कोणी अशी पूजा केली कशी? आणि मग ते आपल्याला कसे कळले नाही? शेवटी काशीराजाने श्रीविनायकांनाच प्रश्न केला. उत्तर रुपात महान गाणपत्य महर्षी श्रीभृशुंडींचे महात्म्य कळले.

राजाने त्यांच्या दर्शनाची अपेक्षा व्यक्त केली. विनायककृपेने राजा अमलाश्रमात (नामलगाव जि. बीड) पोहोचला आणि त्याच्या आश्र्चर्यास पारावार उरला नाही.
भक्त भगवदरुप होते. महर्षीच्या भ्रुमध्यातून सोंडच फुटली होती. त्यांचे नावच होते महर्षी भृशुंडी. जगातील हे एकमेव उदाहरण.

राजाने आपल्या येण्याचा उद्देश सांगितला. महर्षी भृशुंडींनी केलेली मानसपूजा विनायकास प्रत्यक्षरुपात पोहोचल्याचे सांगितले तथा दर्शनार्थ येण्याची प्रार्थना केली.
आश्चर्याचा आणखी एक धक्का तेव्हा बसला जेव्हा महर्षीनी विचारले विनायक गजशुंडाधारी आहेत का? राजा म्हणाला नाही. महर्षी म्हणाले "मग मी दर्शनार्थ येणार नाही."

महर्षी भृशुडींच्या या अत्युत्कट एक निष्ठेच्या फलरुपात श्रीविनायक आपल्या मूळ गजशुंडा रुपात नटले. भक्तीमार्गातील या एकनिष्ठेला अधोरेखित करणारा अवतार आहे श्रीविनायक अवतार.
श्रीविनायक अवतारातील एक वैशिष्ठयपूर्ण कथाभाग म्हणजे देवी सिद्धीच्या अधिपत्याखाली स्थापित स्त्री सैन्य. नारी सैन्याचा हा कदाचित जगातील प्रथम प्रयोग असावा.

श्रीविनायक अवतारातील अंतिम कथा अवतरणकारण रूप लीला म्हणजे देवांतक नरांतक वध. अशा रुपात आपल्या या अवतारातील विविध लीला संपन्न करून श्रीगणराजप्रभू आपल्या स्वानंद लोकी परतले. अशा या दिव्यस्वरूपातील कृतीयुगीन अवताराची अवतरण तिथी आहे माघ. शु. चतुर्थी.

सविस्तर कथाभागार्थ पहावे
१) श्रीमुदगल पुराण खंड २
२) श्रीगणेश पुराण क्रीडाखंड
३) श्री गणराज युगावतार

जय गणेश!

माघ गणेशजयंती - श्रीविनायक जन्मोत्सव!

श्रीगणेश जन्मोत्सव म्हटले की आपणास एकच कथा ज्ञात असते. देवी पार्वतीने अंगावरील मळ उतरवला इ. मग जन्म भाद्रपदाचा असो की माघाचा असो की जेष्ठाचा आपण सगळे हीच कथा सांगतो , ऐकतो. मात्र वास्तव हे आहे की ही कथा आहे कार्तिक शुद्ध चतुर्थीची त्या दिवशी श्रीगणेशांचा उमांगमलज नामक अवतार झाला आहे. सर्वज्ञात कथा या अवताराची आहे.

माघ शुद्ध चतुर्थीचा अवतार हा कश्यप अदिती गृहीचा श्रीविनायक अवतार आहे. त्याची कथा श्रीमुद्गल पुराणान्तरी तथा श्रीगणेश पुराणान्तरी वर्णित आहे.

श्रीमुद्गल पुराणानुसार गौड प्रांतात तर श्रीगणेश पुराणात अंगदेशात या कथेचा आरंभ वर्णिला आहे. स्थळ जरी वेगळे असले तरी व्यक्ती एकच आहे 'रुद्रकेतू!' मुद्गल पुराण म्हणते तो राक्षस होता तर गणेश पुराण म्हणते ब्राम्हण होता. आता हा मेळ कसा घालायचा? तर जन्माने भलेही ब्राम्हण होता पण वृत्तीने राक्षस होता असाच त्याचा भावार्थ.

त्याची धर्मपत्नी होती देवी शारदा. अ त्यंतिक  साध्वी अशा या राणीपासून रुद्रकेतूस जुळे अपत्य झाले. बापाने परम आनंदाने त्यांचे नामकरण केले पण त्या नावातच त्याची आणि पुढे मुलांच्याही विकृतीचे अधोरेखांकन झाले मुलांची नावे ठेवली 'देवांतक - नरांतक'.

देवत्वाला नाकारणारा, संपविणारा, त्यासाठी प्रयास करणारा तो देवांतक तथा मानवियतेचा विनाशक तो नरांतक आता बापानेच ही नावे ठेवल्यावर मुले काय वेगळे चांगुलपण दाखविणार?

मुलांनी बालपणीच उग्र तपस्या केली. श्रीभोलेनाथ शंकरांना प्रसन्न करुन घेतले. राक्षसांची पहिली मागणी असते मृत्यू नसावा. असे वाटणेच राक्षसी आहे. तसे वरदान मिळतच नसते. मग वर मागितला श्री ब्रह्मदेव निर्मित कशानेही मृत्यू नसावा. श्री शिवांनी तथास्तु म्हटले. राक्षसांना वाटले आता आपण अमर झालो. मग त्यांच्यातील 'राक्षस' जागे झाले आणि 'स्त्रीमांस मदिरासक्त:!' या मार्गाने उच्छाद सुरु झाला. स्वर्ग, मृत्यू, पाताळ सर्वत्र केवळ आणि केवळ या उभयतांचाच ध्वज फडकू लागला.

देवता वनवासी झाल्या. सगळ्यांच्या दु:खाने आणखी दु:खी झालेली व्यक्ती म्हणजे देवमाता अदिती. मुलांच्या या हालअपेष्टा तिला पहावत नव्हत्या. ती उद्विग्न मनाने श्री कश्यपांच्या समोर जाऊन पोहचली.

देवी अदितीच्या या आगमनाने श्री कश्यप अतिप्रसन्न झाले. तिची मागणी दोन स्तरावरील होती. एक तर पूर्वपुत्रांच्या व्यथांचे निराकरण हवे होते. पण दुसरी बाजू अधिक दिव्य होती. ती म्हणाली आजवर माझ्या उदरी सगळ्या देवता आल्या. पण परब्रह्म परमात्मा स्वानंदनाथ श्रीगणेश माझ्या घरी बाललीला कसे करतील?

श्रीकश्यप म्हणाले देवी! तपाचरणाला पर्याय नाही. मनीषा जितकी विशाल साधना तितकीच भव्य लागेल की नाही? श्रीगणेशांना प्रसन्न करण्यासाठी त्यांच्याशिवाय दुसरा कोण सहाय्यक ठरणार? तू गणेशोपासनाच करावी.

श्रीकश्यपांकडून उपासनाविधी व मंत्र प्राप्त करून देवी अदिती गहनारण्यात शिरली. अगाध तपातच रत झाली. फलरुपात भगवान स्वानंदनाथ प्रगट झाले आणि बाललीलांचे देवदुर्लभ भाग्य देवी अदितीस लाभले.

देवता वनवासी ठरल्या होत्या. त्यांनीही या संकट निवारणार्थ श्रीगणेशोपासनेचा मार्ग अनुसरला. या सगळ्यांसमोर ही भगवान प्रगटले. दशभुज, सिंहारूढ, सिद्धीबुद्धी समन्वित होते. त्यांनी देवतांना आशीर्वचन दिले लवकरच आम्ही श्रीअदितीच्या घरी विनायक रुपात अवतीर्ण होऊ. देवांतक नरांतक वध करून भूभार हरण करू. सगळ्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही.

आता सगळेच त्या शुभदिनाची आर्तपणे वाट पाहू लागले. माघ शुद्ध चतुर्थीला, मंगळवारी दुपारी बारा वाजता, मध्यान्ह समयी भगवान विनायक रुपात प्रगट झाले. सगळ्यांपेक्षा उत्कट असल्याने या अवतारास 'महोत्कट' असे नामकरण करण्यात आले.

श्रीविनायक अवताराच्या अनेकानेक कथा दोन्ही पुराणात वर्णीत आहेत.

श्री महोत्कटांच्या उपनयन संस्काराच्या वेळी सगळ्या देवतांनी त्यांना शस्त्रात्रेच दिली. कोणी म्हणेल मुंजीत हत्यारे कशाला? तर उपनयनाचा हा ही एक भाव आहे की मी हून कोणावर आक्रमण करणार नाही. पण कोणी अंगावर आलाच तर मारही खाणार नाही.

विनायक अवतारात श्रीगणेशांनी गंधर्व गर्वहरण, धुम्राध्नवध, भृशुंडी कथेच्या आधारे भक्तिमार्गाचे निरुपण, शुक्ल विद्रुमा कथेतून साधकाची जीवनशैली, देवी सिद्धीबुद्धी च्या नारी सैन्याचा प्रथम प्रयोग, देवांतक नरांतक विनाश लीला अशा अनेक लीला केल्या आहेत. त्या सगळ्या अफाट विवेचनाचा विषय असल्याने मुळातूनच पहाव्यात.

या विनायक अवताराची प्रगटीकरण कथा ही आजची कथा आहे. माघ शुद्ध चतुर्थी ही विनायक जयंती आहे. या अवताराचे वैभव हेकी हा कश्यप अदिती आश्रमात झाला असल्याने हा पृथ्वी वरील अवतार आहे. ही भूलोकाची गणेश जन्म चतुर्थी आहे.

जय गजानन ! जय विनायक! जय गणेश!

माघ शु. चतुर्थी! श्रीविनायक जन्मोत्सव!

भगवान श्री गणेशांच्या हजारो अवतारांचे वर्णन श्रीमुदगल पुराणकारांनी केलेले आहे. या प्रत्येक अवताराचे प्रयोजन मातापिता, राक्षसवध, भक्तसंरक्षण

. लीला वेगवेगळया आहेत.

आपणास मात्र सामान्यत: गणेशजन्माची एकच कथा ज्ञात असते. तीच भाद्रपदी चतुर्थीला आणि तीच माघी चतुर्थीलाही सांगून आपण मोकळ होतो. वास्तविक ती कथा आहे कार्तिक शुध्द चतुर्थीची. त्या दिवशी श्रीगणेशांचा "उमांगमलज" नामक अवतार झाला. आपणास ज्ञात असलेली सर्वश्रुत कथा त्या चतुर्थीची आहे.

आज आहे माघ शु. चतुर्थी. आजचा गणेशजन्म आहे श्रीविनायक जन्मोत्सव. या चतुर्थीचे वैभव हे आहे की ही या पृथ्वीची चतुर्थी आहे. महामुनी कश्यप तथा देवी अदितीच्या आश्रमात झालेला हा पृथ्वीवरील अवतार आहे.

श्रीमन मुदगल पुराणाच्या द्वितीय खंडात हे विनायक चरित्र खूप विस्तारपूर्वक वर्णिले आहे. संक्षिप्तत: त्याचा आढावा घेऊ.

गौड प्रांतात रुद्रकेतू तथा शारदा नामक दाम्पत्याला जुळी अपत्ये झाली. त्यांची देवांतक तथा नरांतक अशी नावे रूढ झाली. देवर्षी नारदांनी या दोघांना शिवपंचाक्षरी महामंत्राचा उपदेश करून तपाचरणास लावले. वरदान रुपात "श्रीब्रह्मदेव निर्मित कोणत्याही पदार्थाने मृत्यू नसावा" असा अदभुत वर भेटला आणि मग जणू आपण अमर झालो या भावनेला त्यांची राक्षसीवृत्ती जगाला त्रस्त करू लागली. त्रीभूवनावर सत्ता स्थापन झाली. देवता स्वलोकातून निर्वासित झाल्या. अरण्यवासी ठरल्या. मग यांनी देवता आहार रूप यज्ञाचा विनाश सुरु केला. देवतांना उपवास घडू लागले आणि त्यांच्या या दु:खाने सर्वाधिक व्यथित झाली ती देवमाता आदिती.

श्रीकश्यपांसमोर तिने आपली व्यथा मांडली आणि उत्तररुपात तिला श्रीगणेशोपासना रहस्य प्राप्त झाले. त्या आधारे तिने कठोर तपाचरण केले आणि फलरुपात श्रीगणेशदर्शन तथा पुत्ररुपात आश्रमात अवतरण्याचे त्यांचे श्रीवचन लाभले.

इकडे देवांतक नरांतक अत्याचाराने त्रस्त झालेल्या देवतांनाही अंतिम उपाय रुपात श्रीगणेशाराधन सुरु केले आणि या सगळयांच्या आर्ततापूर्ण हाकेला प्रतिसाद रुपात माघ शु. चतुर्थीला कश्यपगृही भगवान श्रीविनायक रुपात अवतीर्ण झाले.

या अवतारात अनेकानेक बाललीला पहावयास मिळाल्या. श्रीमुदगलपुराणापेक्षा या बाललीलांचे कौतुक श्रीगणेशपुराणाच्या क्रीडाखंडात अधिक व्यापक रीतीने शब्दबद्ध करण्यात आले आहे.

यातील अनेक लीलांचे तात्पयीर्थ मोठे अदभुत आहेत. उदा. श्री विनायकाच्या उपनयन प्रसंगी अनेक देवतांनी त्यांना भेट रुपात शस्त्रास्त्रे दिली. वरपांगी पाहता उपनयन तर शास्त्राभ्यासाचा आरंभ. मग शस्त्रे का दिली? तर जोवर शास्त्र आणि शस्त्र यांचा समन्वय होत नाही तोवर देवांतक, नरांतक या वृत्तींचा विनाश संभव नाही.

पुराणकारांनी वर्णिलेले राक्षस या केवळ व्यक्ती नसतात तर त्या प्रवृत्ती असतात. देव कार्यास विरोध करतात ते देवांतक. तर मानवीय मूल्यांना उध्वस्त करतात ते नरांतक. यांच्या निर्दालनाकरीता अनिवार्य आहे. हा या कथेचा भाव समजून घेणे आणि आचरणात आणणे आवश्यक आहे.

गंधर्वकथा ही अशीच रोचक कथा. गंधर्वाचे राजे हाहा आणि हुहु हे कश्यपाश्रमात आले. बालविनायक तेथे खेळत होते. या गंधर्वांनी पंचायतन पूजा आरंभिली. श्रीगणेश, श्रीविष्णू, श्रीशंकर, श्रीदेवी तथा श्रीसूर्य या पाचही देवतांचे नियमित

पूजन करण्यास पंचायतन पूजन असे म्हणतात. याचे मूळ कारण सगळया मार्गांचा समन्वय असते. मात्र पाचांची पूजा करतांना त्यांना वेगवेगळे मानण्यात आणि आम्ही पाचांचीही पूजा करतो याचाच अभिमान आणि पुढे जाऊन अहंकार वाटणाऱ्या गंधर्वांना श्री विनायकाने धडा शिकवला.

श्रीविनायकांनी त्या पाचही मूर्ती गिळून टाकल्या. मग आकांडतांडव करणाऱ्या गंधर्वांना स्वत:च पाचही रुपात दर्शन दिले. सगळे काही "मोरयाच" आहे हे समजावून सांगणारी ही मोरया कृती आहे.

श्री विनायकांच्या लीला स्थानात कश्यपाश्रमाशिवाय काशीक्षेत्रालाही मोठे वैभवशाली स्थान आहे.

काशीराज्याच्या मुलाच्या विवाहाच्या निमित्ताने श्रीविनायक काशी नगरीत आले. तेथे त्यांनी सगळयाच गावकऱ्यांना लळा लावला. सगळयांनाच वाटू लागले की श्रीविनायक आपल्या घरी यावेत. हा आग्रह खूपच वाढला आणि मग एकेदिवशी श्रीविनायकांनी घोषित केले उद्या आम्ही सगळयांच्याच घरी येऊ.

ही वार्ता सगळया गावात पोहोचली. गावाबाहेर एका झोपडीत राहणाऱ्या महर्षी शुक्ल तथा देवी विद्रुमा नामक दाम्पत्याला ही वार्ता कळली. पण आनंदव्यक्त करावा ही व्यथा हेच कळेना. कारण प्रभू घरी येणार हा आनंद पण स्वागताला घरात फुटकी कवडीही नाही याचे दु:ख.

शेवटी आहे त्यासह स्वागताची तयारी सुरु झाली. राखेने रांगोळी, दर्भाने ध्वजा, फुलाने आसन तयार करण्यात आले. पण खायला काय देणार? शेवटी भिक्षा मागितली. मिळेल त्या सगळयाचे पीठ करून लापसी करण्यात आली.

दुसऱ्या दिवशी राजवैभवाने स्वागत करणाऱ्या सगळयांना सोडून भगवान श्रीशुक्लांच्या झोपडीतच गेले. भगवान वैभवाचा नव्हे तर भावाचा भुकेला असतो हे सांगणारी ही कथा.

विनायक अवताराची वैभवशाली कथा आहे चतुर्थी वैभव कथनकारी श्री भृशुंडीकथा.

एके दिवशी सकाळीच काशीराजा श्रीविनायकांच्या महाली आले आणि त्यांनी जे दृश्य पाहिले त्यावर त्यांचा विश्वासच बसेना. कारण श्री विनायकांची अशा दिव्यतम उपचारांनी श्रीविनायकांची पूजा संपन्न झाली होती की जे उपचार काशिराजाला राजवाडयात सुद्धा संभव नव्हते.

ही पूजा कोणी? कधी? कशी? केली असे अनेक प्रश्न राजाच्या मनात आले. राजवाडयात येऊन कोणी अशी पूजा केली कशी? आणि मग ते आपल्याला कसे कळले नाही? शेवटी काशीराजाने श्रीविनायकांनाच प्रश्न केला. उत्तर रुपात महान गाणपत्य महर्षी श्रीभृशुंडींचे महात्म्य कळले.

राजाने त्यांच्या दर्शनाची अपेक्षा व्यक्त केली. विनायककृपेने राजा अमलाश्रमात (नामलगाव जि. बीड) पोहोचला आणि त्याच्या आश्र्चर्यास पारावार उरला नाही.

भक्त भगवदरुप होते. महर्षींच्या भ्रूमध्यातून सोंडच फुटली होती. त्यांचे नावच होते महर्षी भृशुंडी. जगातील हे एकमेव उदाहरण.

राजाने आपल्या येण्याचा उद्देश सांगितला. महर्षी भृशुंडींनी केलेली मानसपूजा विनायकास प्रत्यक्षरुपात पोहोचल्याचे सांगितले तथा दर्शनार्थ येण्याची प्रार्थना केली.

आश्चर्याचा आणखी एक धक्का तेव्हा बसला जेव्हा महर्षींनी विचारले विनायक गजशुंडाधारी आहेत का? राजा म्हणाला नाही. महर्षी म्हणाले "मग मी दर्शनार्थ येणार नाही."

महर्षी भृशुडींच्या या अत्युत्कट एक निष्ठेच्या फलरुपात श्रीविनायक आपल्या मूळ गजशुंडा रुपात नटले. भक्तीमार्गातील या एकनिष्ठेला अधोरेखित करणारा अवतार आहे श्रीविनायक अवतार.

श्रीविनायक अवतारातील एक वैशिष्ठयपूर्ण कथाभाग म्हणजे देवी सिद्धीच्या अधिपत्याखाली स्थापित स्त्री सैन्य. नारी सैन्याचा हा कदाचित जगातील प्रथम प्रयोग असावा.

श्रीविनायक अवतारातील अंतिम कथा अवतरणकारण रूप लीला म्हणजे देवांतक नरांतक वध.

अशा रुपात आपल्या या अवतारातील विविध लीला संपन्न करून श्रीगणराजप्रभू आपल्या स्वानंद लोकी परतले.

अशा या दिव्यस्वरूपातील कृतीयुगीन अवताराची अवतरण तिथी आहे माघ. शु. चतुर्थी.

जय गणेश!